वास्तुशास्त्रज्ञ, गट-अ या निम्न संवर्गातून वरिष्ठ वास्तुशास्त्रज्ञ, गट-अ या वरिष्ठ संवर्गात पदोन्नती व पदस्थापना.

# महाराष्ट्र शासन

## सार्वजनिक बांधकाम विभाग

**शासन आदेश क्रमांकः पदोन्न-१३२३/प्र.क्र.२१३/सेवा-१**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- १६ मार्च, २०२४.

वाचा :- सा.बां. विभाग अधिसूचना क्रमांक : आरटीआर१०८८ / प्र.क्र.५ / आस्था-१, दि. ०१.०८.२०१४.

**शासन आदेश :-**

सार्वजनिक बांधकाम विभागातील वास्तुशास्त्र उपविभागातील वास्तुशास्त्रज्ञ, गट-अ (वेतनसंरचना एस-२० : रु.५६१००-१७७५००) या निम्न संवर्गातील अधिकाऱ्यांना संदर्भाधीन शासन अधिसूचनेन्वये विहित केलेल्या सेवाप्रवेश नियमानुसार, वरिष्ठ वास्तुशास्त्रज्ञ, गट-अ (वेतनसंरचना एस-२३ : रु. ६७७००-२०८७००) या वरिष्ठ संवर्गात सन २०२२-२३ च्या निवडसूचीमध्ये ज्येष्ठतेनुसार, निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात नियमित पदोन्नती देण्यात येत आहे. वरिष्ठ वास्तुशास्त्रज्ञ, गट-अ म्हणून त्यांची पदस्थापना त्यांच्या नावांसमोर स्तंभ ५ मध्ये दर्शविलेल्या पदावर करण्यात येत आहे.

| क्र. | ज्ये. क्रमांक व दिनांक | अधिकाऱ्याचे नाव व जात प्रवर्ग | सध्याची पदस्थापना | पदोन्नतीने पदस्थापना |
|---|---|---|---|---|
| (१) | (२) | (३) | (४) | (५) |
| १ | ३<br>२२.०२.२०२३ | श्री.विजय काशिनाथ शेवरे. (अ.ज.) | उप मुख्य वास्तुशास्त्रज्ञ कार्यालय, छत्रपती संभाजीनगर. | वरिष्ठ वास्तुशास्त्रज्ञ, उप मुख्य वास्तुशास्त्रज्ञ कार्यालय, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, छत्रपती संभाजीनगर (रिक्त पदी) |
| २ | ५<br>२२.०२.२०२३ | श्रीमती अमिषा अमुल वाघवसे. (खुला) | उप मुख्य वास्तुशास्त्रज्ञ कार्यालय, छत्रपती संभाजीनगर. | वरिष्ठ वास्तुशास्त्रज्ञ, उप मुख्य वास्तुशास्त्रज्ञ कार्यालय, सार्वजनिक बांधकाम विभाग, नागपूर (रिक्त पदी) |

२. वर नमूद वास्तुशास्त्रज्ञ यांची पदोन्नती पुढे नमूद केलेल्या अटींच्या अधीन राहून तात्पुरत्या स्वरुपात करण्यात येत आहे :

i. सदर पदोन्नती ही मा. सर्वोच्च न्यायालयातील विशेष अनुज्ञा याचिका क्रमांक २८३०६/२०१७ मधील अंतिम निर्णयास अधीन राहून तसेच रिट पिटीशन स्टँप नं. १०८७६/२०२१ व रिट पिटीशन स्टँप नं. १०८७८/२०२१ मध्ये मा. उच्च न्यायालय, मुंबई यांनी दि. २५.५.२०२१ रोजी दिलेल्या निर्णयानुसार सदर पदोन्नती नमूद रिट याचिकेत होणाऱ्या निर्णयाच्या अधीन राहील.

ii. सदर पदोन्नती ही निव्वळ तात्पुरत्या स्वरुपाची असल्याने पदोन्नतीच्या परिणामी त्यांना नियमितपणाचा व सेवाज्येष्ठतेचा कोणताही हक्क राहणार नाही.

३. वर नमूद अधिकाऱ्यांना देण्यात आलेली तात्पुरती पदोन्नती ही कोणतीही पूर्वसूचना किंवा नोटीस न देता रद्द करण्याचा अधिकार शासन राखून ठेवत आहे.

४. संबधित नियंत्रक अधिकाऱ्यांना कळविण्यात येते की, त्यांनी सदर अधिकाऱ्यांना त्यांच्या नवीन नियुक्तीच्या जागी रूजू होता यावे म्हणून आवश्यक ती स्थानिक पर्यायी व्यवस्था करून पदमुक्त करावे व नवीन नियुक्तीच्या ठिकाणी हजर होण्यास सांगावे. तसेच, संबंधित अधिकाऱ्यांना पदोन्नतीने पदस्थापनेच्या ठिकाणी रुजू होण्यासाठी कोणत्या दिनांकास कार्यमुक्त केले आणि ते पदस्थापनेच्या ठिकाणी कोणत्या दिनांकास हजर झाले, याबाबत शासनास doser1.pwd@maharashtra.gov.in या ई-मेल आयडीवर त्वरित अवगत करावे.

५. संबंधित अधिकाऱ्यांनी कमीतकमी पदग्रहण अवधी घेऊन नव्या पदाचा पदभार स्वीकारावा व आपला पदग्रहण अहवाल शासनास विनाविलंब सादर करावा. महाराष्ट्र नागरी सेवा (ज्येष्ठतेचे विनियमन) नियमावली, २०२१ मधील तरतूदीनुसार पदोन्नतीने नियुक्त होणाऱ्या शासकीय कर्मचाऱ्यांने पदोन्नती आदेश निघाल्याच्या दिनांकापासून ३० दिवसांच्या आत पदस्थापनेच्या पदावर रुजू होणे आवश्यक आहे. सदर अधिकारी पदोन्नतीने पदस्थापनेच्या पदावर या आदेशाच्या दिनांकापासून ३० दिवसांच्या विहीत मुदतीत रुजू न झाल्यास त्यांचा अनुपस्थितीचा कालावधी हा अकार्यदिन (dies non) म्हणून गणला जाईल. **संबंधित अधिकारी आदेशाच्या दिनांकापासून ३० दिवसांच्या विहित मुदतीत अथवा पूर्व मान्यतेने रुजू होण्यासाठी मंजूर केलेल्या वाढीव कालावधीत रूजू न झाल्यास, त्यांना पदोन्नतीत स्वारस्य नाही, असे समजून संबंधित अधिकाऱ्याचे पदोन्नतीचे आदेश आपोआप रद्द झाले, असे समजण्यात येईल.** तसेच, त्यांचे लक्ष महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणूक) नियम, १९७९ मधील नियम-२३ कडे वेधण्यात येत आहे. सदर नियमातील तरतूदी लक्षात घेता, त्यांनी पदस्थापनेत बदल करण्यासाठी कुठल्याही स्वरुपाची आवेदने सादर केल्यास ते शिस्तभंगाच्या कारवाईस पात्र ठरतील.

६. संबंधित नियंत्रक अधिकाऱ्यांना कळविण्यात येते की, सदर अधिकाऱ्यांनी पदभार स्वीकारल्याचा दिनांक त्वरित शासनास doser1.pwd@maharashtra.gov.in या ई-मेल पत्त्यावर कळवावा. विहीत कालावधीत ते रुजू न झाल्यास, त्याबाबत शासनास त्वरित अवगत करण्यात यावे, जेणेकरुन संबंधितांविरुद्ध शिस्तभंगविषयक कारवाई त्वरित करणे शक्य होईल. म.ना.से. (रजा) नियम, १९८१ मधील नियम-३० (सी) नुसार त्यांचा रजा अर्ज स्वीकारु नये / मंजूर करु नये.

७. संबंधित अधिकाऱ्यांनी पदोन्नतीच्या पदावर पदग्रहण केल्यापासून एक महिन्याच्या आत वेतननिश्चितीचा विकल्प द्यावा. असा विकल्प विहित मुदतीत न दिल्यास त्यांची वेतननिश्चिती महाराष्ट्र नागरी सेवा (वेतन) नियम, १९८१ मधील नियम क्र. ११ (१) (ए) अनुसार पदोन्नतीचा दिनांक विचारात घेवून करण्यात यावी.

८. संबंधित अधिकाऱ्यांनी नवीन नियुक्तीच्या पदाचा पदभार स्वीकारल्याचा दिनांक शासनास तसेच संचालक, माहिती तंत्रज्ञान समन्वय केंद्र, हॉटेल सागर प्लाझा समोर, कँप, पुणे यांना कळवावा.

९. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०३१६१३५९३४४५१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

DATTATRAY VASANTRAO KHARKE

Digitally signed by DATTATRAY VASANTRAO KHARKE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC WORKS DEPARTMENT, 2.5.4.20=d598800beb5ed37ae09d78fff05921827123426ec3977a7476478ce183be979d, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=6BAEF55AD6F77A3A40CCCC3E9DD0F50E344AB83A754542299875CF07868ED88B, cn=DATTATRAY VASANTRAO KHARKE
Date: 2024.03.16 14:08:47 +05'30'

**( द.व. खारके )**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई,
२. मा. उप मुख्यमंत्री (गृह) यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई,
३. मा. उप मुख्यमंत्री (वित्त) यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई,
४. मुख्य वास्तुशास्त्रज्ञ, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
५. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, मुंबई / कोकण / पुणे / नाशिक / छत्रपती संभाजीनगर / नांदेड / अमरावती / नागपूर/ राष्ट्रीय महामार्ग विभाग, नवी मुंबई,
६. संचालक, माहिती तंत्रज्ञान समन्वय केंद्र, हॉटेल सागर प्लाझा समोर, कँप, पुणे,
७. महालेखापाल -१/२ (लेखा व अनुज्ञेयता / लेखापरीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर,
८. सार्वजनिक बांधकाम विभागातील सर्व अधीक्षक अभियंते,
९. श्री.विजय काशिनाथ शेवरे, वास्तुशास्त्रज्ञ, उप मुख्य वास्तुशास्त्रज्ञ कार्यालय, सा.बां.वि., छत्रपती संभाजीनगर,
१०. श्रीमती अमिषा अमुल वाघवसे, वास्तुशास्त्रज्ञ, उप मुख्य वास्तुशास्त्रज्ञ कार्यालय, सा.बां.वि., छत्रपती संभाजीनगर.
११. संचालक (उपवने व उद्याने), महाराष्ट्र राज्य, मुंबई,
१२. संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी,
१३. सामान्य प्रशासन विभाग, का.-१२ / १६-ब, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई,
१४. मा. मंत्री, सा.बां. (सार्वजनिक उपक्रम वगळून) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
१५. मा. मंत्री, सा.बां. (सार्वजनिक उपक्रम) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
१६. अपर मुख्य सचिव (सा.बां.), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहायक,
१७. सचिव ( रस्ते / बांधकामे), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहायक,
१८. सर्व सह सचिव / उप सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई
१९. कार्यासन अधिकारी ( सेवा-२ / आस्था-१ / आस्था- ३ / सेवा-६ / संगणक कक्ष) , सा. बां. विभाग, मंत्रालय, मुंबई,
२०. निवडनस्ती.